**सामूहिक वनहक्क मान्यता प्राप्त ग्रामसभांना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत अंमलबजावणी यंत्रणा म्हणून घोषित करण्याबाबत**

# महाराष्ट शासन

## नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)

**शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१९/प्र.क्र.१४४/मग्रारो-०१**

**मंत्रालय, मुंबई-४०००३२**

**दि. ३० नोव्हेंबर, २०२१**

वाचा :-

१. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियम, २००५
२. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे) अधिनियम २००६, नियम २००८ व सुधारित नियम २०१२
३. शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१२/प्र.क्र.२५/रोहयो-१, दिनांक.१९ एप्रिल, २०११
४. शासन निर्णय क्र.मग्रारो २०१२/प्र.क्र.६३/रोहयो-१, दि.८ जानेवारी, २०१३
५. जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२३०११/४७/२००९-एसजी-II (एफआरए), दि.२७ जुलै, २०१० चे पत्र

प्रस्तावना :-

महाराष्ट्र रोजगार हमी कायदा, १९७७ व महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोज़गार हमी कायदा, २००५ अन्वये ग्रामपंचायतीने कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून काम करायचे आहे. त्यासाठी ग्रामपंचायती द्वारे ग्राम सभेच्या मंजूरीने दरवर्षी समृद्धी (लेबर) बजेट तयार करावयाचे असते. या प्रक्रियेत गट ग्राम पंचायत असलेल्या पंचायतींमध्ये पंचायत मुख्यालय शिवाय इतर गावांमधील नागरिकांचा सहभाग कमी प्रमाणात असते. त्यामुळे तेथील गरजांकडे पाहिजे त्या प्रमाणात लक्ष जात नसलेचे आढळून आले आहेत.

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे) अधिनियम २००६ च्या कलम ३.१ अनुसार ग्रामपंचायत नसलेले राजस्व गाव, टोला, पाडा, तांडा यांच्या सर्व मतदारांच्या मिळून बनलेल्या सभेस ग्रामसभा म्हणून कायदेशीर मान्यता देवून या ग्रामसभांना सामुदायिक वन अधिकार मान्यता देणारे अधिकार अभिलेख देण्यात आलेले आहेत. राज्यात ५००० पेक्षा जास्त गावांना सामुहिक वनहक्क प्राप्त झालेले आहेत. या सामुहिक वन अधिकार मान्यता प्राप्त ग्रामसभांना अधिनियमाचे क़लम ५ अन्वये त्यांचे सामुहिक वनहक्क क्षेत्र व जल स्त्रोतांचे संरक्षण करायचे आहे व या संसाधनांवर आधारित सुबत्ता निर्माण करायची आहे. रोपवाटीका, वनीकरण, बंधारे, तलाव, शेतीची बांध बंदिस्ती व याला पुरक इतर कामांमुळे भुगर्भ व भुतळावरील पाणी साठे वाढतील, शेतीचे उत्पन्न व वनोपज वाढेल. यामुळे आदिवासी व इतर वननिवासी नागरिकांना रोज़गार मिळेल व त्यांचा आर्थिक विकास होईल. याकरिता प्रत्येक गाव, टोला, पाडा यांनी आपल्या क्षेत्राचा संवर्धन व विकास आराखडा तयार करायची आहे. विकेंद्रीत पद्धतीने गाव, टोला, पाडा हे घटक म्हणून नियोजन केले तर त्याचे चांगले व निश्चित परिणाम होईल व गावातील नागरिक यात सहभागी होतील. या हेतूने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोज़गार हमी

योजनेंतर्गत गाव मेंढा (लेखा) ता. धानोरा, जि. गडचिरोली येथे ग्रामसभा यांना कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून मान्यता देऊन पथदर्शी प्रकल्प राबविण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ अन्वये मान्यता देण्यात आली तद्नंतर संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोज़गार हमी योजनेंतर्गत संयुक्त वन व्यवस्थापन समित्यांना यंत्रणा म्हणून काम करण्यास काही अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे. तथापि, या यंत्रणांकडून मनरेगा योजनांची परिणामकारक अंमलबजावणी केल्याचे दिसून आले नाही.

वर उल्लेखित पार्श्वभूमीवर संदर्भाधीन क्र.३ व ४ येथील शासन निर्णय निरसित करून योजना बनवून कार्यान्वयित करण्याकरिता सामुहिक वनहक्क मान्यता प्राप्त ग्रामसभांना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत अंमलबजावणी यंत्रणा म्हणून घोषित करण्याची आवश्यकता आहे. सबब या गावांच्या ग्रामसभांना व त्यांचे कार्यकारी मंडळ म्हणजेच सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समितीला महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना राबविण्याकरीता यंत्रणा म्हणून घोषित करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. उपरोक्त बाबी विचारात घेऊन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. संदर्भाधीन क्र. व ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहेत. गाव, टोला, पाडा याला सुक्ष्म घटक मानून विकेंद्रीत पद्धतीने रोजगार हमी योजना राबविण्याकरिता महाराष्ट्र रोजगार हमी कायदा, १९७७, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोज़गार हमी कायदा, २००५ व अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे) अधिनियम २००६ यांची सांगड घालून सामुदायिक वन अधिकार मान्यता प्राप्त गावाच्या ग्रामसभेला महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत कामे करण्यासाठी अंमलबजावणी यंत्रणा म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

२. वनहक्क प्राप्त जमीनीवरील सर्व कार्यांचे नियोजन व खर्च ग्रामसभेचे मंजूरीने वनहक्क कायद्याचे क़लम ४(१)(ड.) नुसार ग्राम सभेद्वारा गठीत कार्यकारी मंडळ करेल.

३. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची कामे गावाचे सामुहिक वनहक्क क्षेत्रातील वनाची वाढ, जलसंधारण व वनहक्क धारकाचे उपजिविकेकरीता अंतर्भूत योजनांचा समावेश करून केली जातील.

४. ग्राम सभेने चिन्हांकित केलेले सर्व कार्य ग्रामपंचायतीस सादर केले जाईल व त्याची पोच पावती घेतली जाईल. ग्रामपंचायतीने या यादीस मान्यता देऊन १५ दिवसांच्या आत पंचायत समितीस सादर करावे.

५. ग्रामपंचायतीने वरील बिंदु प्रमाणे १५ दिवसांच्या आत कार्यवाही केला नाही तर ग्राम सभेतील कार्यकारी मंडळाने ही यादी ग्रामपंचायतीने दिलेल्या पावतीसह पंचायत समितीस सादर करावे. तसेच ग्राम सभेद्वारा यादी सादर केल्यावर एखाद्या ग्रामपंचायतीने पावती देण्यास नकार दिल्यास तर कार्यकारी मंडळाने ग्राम सभेद्वारे मंजूर कामांची यादीसह तसे लेखी स्वरूपात पंचायत समितीस कळवावे.

६. उपरोक्त मुद्दा क्रमांक ३ व ४ मधील कोणत्याही प्रकारे यादी प्राप्त झाल्यावर पंचायत समितीने सदर यादीस समृद्धी बजेट मध्ये जोडण्याची पुढील कार्यवाही शासन परिपत्रक २ सप्टेंबर २०२१ मधील मुद्दा क्रमांक ५ नुसार त्वरेने कार्यवाही करावी जेणेकरुन यादी प्राप्त झाल्याचे ४५ दिवसांच्या आत समृद्धी बजेट मध्ये जोडले जाईल.

७. ग्रामसभा मेटची निवड करेल. या गावांमध्ये मेट हेच ग्राम रोजगार सेवकाचे सर्व जबाबदाऱ्या पार पाडतील. मेट (ग्राम रोजगार सेवक) चे मानधन ग्रामसभेमार्फत देण्यात येईल.

८. सामुहिक वन अधिकार मान्यता प्राप्त ग्रामसभा स्वतःचे कार्य करण्यास सक्षम व्हावे या उद्देशाला धरून ग्रामसभा स्थानिक युवक अथवा युवती मधून बेअर फुट टेक्निशियन ची निवड करेल.

**बेअर फुट टेक्निशियन निवडीचे निकष :-**

i. संबंधित युवक/ युवतीचे नाव कुटुंबाच्या जाबकार्ड मध्ये असणे आवश्यक राहील.
ii. हे जॉबकार्ड वर्तमान आर्थिक वर्ष आणि मागील दोन वर्षे एक्टीव्ह असावे किंवा मेट/ ग्राम रोजगार सेवक म्हणून कार्यरत असावे.
iii. संबंधित युवक/ युवतीचे शिक्षण किमान १२ वी झालेले असावे. तथापि, एखाद्या ग्रामसभेत १२ उत्तीर्ण झालेले व्यक्ती उपलब्ध नसल्यास १० उत्तीर्णास नियुक्तीची परवानगी असेल.
iv. बेअर फुट टेक्निशियन त्याच ग्राम सभेतील असणे बंधनकारक नाही. संबंधित ग्रामसभेत वरील निकष पूर्ण करणारे युवक/ युवती उपलब्ध नसले तरच इतर गावांमधील उमेदवारांचा विचार करण्यात यावा.
v. अनुसूचित जमाती/ अनुसुचित जाती तसेच महिलांचे पूरेशे प्रतिनिधित्व असावे.

९. बेअर फुट टेक्निशियन यांची नियुक्ती करण्यापूर्वी त्यांना प्रशिक्षण देण्यात यावे. त्यात योजना बनवणे, त्याची अंमलबजावणी करणे, सामुग्री पुरवठयासाठी आवश्यक निविदा प्रक्रिया, साहित्यांची खरेदी, लेखा पुस्तक संधारित करणे इत्यादींचा समावेश राहील. यशस्वी प्रशिक्षणार्थींना प्रमाणपत्र द्यावे. प्रशिक्षणात यशस्वी उमेदवार फक्त बेअर फुट टेक्निशियन म्हणून नियुक्तीस पात्र राहतील. प्रशिक्षणाचे नियोजन जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी करावे.

१०.बेअर फुट टेक्निशियन कार्यकर्त्यांचे निवडीनंतर प्रशिक्षित होऊन तांत्रिक सहायक म्हणून कार्य करायला सुरूवात करण्यास काही कालावधी लागेल. तोपर्यंत पंचायत समितीतील तांत्रिक सहायक या ग्रामसभेच्या रोहयोअंमलबजावणी यंत्रणेचे सदस्य सचिव म्हणून कार्य करतील.

११.गटविकास अधिकारी प्रत्येक ग्राम सभेकरिता (गावाकरिता) ग्रामसभेच्या संमतीने तांत्रिक सहाय्यकाची सदस्य सचिव म्हणून नेमणूक करतील. या तांत्रिक सहायकाचे ग्रामसभेला योग्य प्रमाणे सहकार्य मिळावे म्हणून दर आठवड्याला ग्रामसभेला भेट देतील किंवा संबंधित व्यक्तींशी दूरध्वनी/झूम वर संपर्क साधतील.

१२.ग्राम सभेतील नियोजित कामांची अंमलबजावणी पंचायत समितीद्वारे, ग्रामसभेव्दारे की शासनाचे अन्य विभागामार्फत व्हावे हे ग्रामसभेच्या मंजुरीने कार्यकारी मंडळ निश्चित करेल. मात्र एका कामासाठी अशी निश्चिती फक्त एकदा करता येईल. काही विशिष्ट कारणास्तव त्यात बदल करणे आवश्यक असल्यास जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक त्यासाठी सक्षम प्रधिकारी असतील.

१३.पंचायत समिती/ संबंधित विभागाचे अधिकारी / प्रशिक्षित बेअर फुट टेक्नेशियन गावाची गरज व ग्रामसभाद्वारे मंजूर नियोजन आराखड्यानुसार योजना, तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रक तयार करतील व त्याकरीता सर्व प्रकारचे सहाय्य करतील. संबंधित विभागाचे अधिकारी नियमानुसार तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्रदान करतील.

१४.पंचायत समिती द्वारे केल्या जाणाऱ्या सर्व कामांचे अंदाजपत्रक तांत्रिक सहाय्यक तयार करतील. त्यातील बांधकामाशी निगडीत कामांना तांत्रिक मान्यता पंचायत समितीतील कनिष्ठ अभियंता व फळबाग, शेतात/ शेताच्या बांधावर तसेच वनहक्क प्राप्त सार्वजनिक/ सामुदायिक जमीनीवरील वृक्ष लागवडीशी निगडीत कामांना तांत्रिक मान्यता पंचायत समितीतील कृषी विस्तार अधिकारी देतील.

१५.कामावर देखरेख ग्रामसभेद्वारा नियुक्त सामुहिक वनहक्क समितीचे प्रतिनिधी, संबंधित विभागाचे प्रतिनिधी किंवा बेअर फुट टेक्निशियन/ तांत्रिक सहाय्यक करतील.

१६.मस्टर भरून त्यावर स्वाक्षरी मेट (ग्रामरोजगार सेवक) करेल व ग्रामस्तरीय रोहयो अंमलबजावणी यंत्रणेची मंजुरी घेवून संबंधित विभागाचे अधिकारी/ तांत्रिक सहाय्यकास सादर करेल.

१७.या मस्टर च्या आधारे संबंधित विभाग/ पंचायत द्वारे FTO raise करून राशी प्रदान करण्यात येईल.

१८. सार्वजनिक कामाचे कुशल व अर्धकुशल राशीचे प्रदान पंचायत समिती/ संबंधित विभागाद्वारे बँकेमार्फत ग्रामसभेचे **"ग्रामसभा.....(गावाचे नाव), (रोहयो)"** नावाने उघडलेल्या वेगळ्या बँक खात्यात व वैयक्तिक कामाचे प्रदान संबंधित व्यक्तीच्या बँक खात्यात करण्यात येईल.

१९.महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत कार्य करत असतांना अग्रिम देण्याची व्यवस्था नसल्यामुळे वैयक्तिक कार्य करताना काही कुटुंबांना निधी अभावी कार्य करण्यास अडचणी निर्माण होतात. अशा कुटुंबांच्या कार्यास ग्राम सभेने अंमलबजावणीच्या वेळेस आर्थिक मदत करावी. अशा प्रकारे करण्यात आलेल्या कामांचे कुशल व अर्धकुशलचे राशी ग्राम सभेच्या बँक खात्यावर वर्ग करण्यात येईल.

२०.सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समिती ग्रामसभेच्या वतीने व मंजूरीने केवळ वनहक्क कायद्यानुसार प्राप्त सामुहिक वने, जलग्रहण क्षेत्रे, जलसंसाधने व वनहक्क धारकाचे शेती या क्षेत्रातच कामे करू शकतील. तथापि, त्याच महसूली गावातील वनहक्क कायद्यानुसार प्राप्त जमीनीवरील कामे ग्रामपंचायतीस सुचविण्याचा हक्क या ग्राम सभेला राहील. ती कामे समृद्धी (लेबर) बजेट मध्ये समाविष्ट करणे संबंधित ग्रामपंचायतीस बंधनकारक असेल. मात्र या कामांची अंमलबजावणी सदर ग्राम सभेनी मागणी केल्यानुसार पंचायत किंवा अन्य शासकीय यंत्रणेमार्फत करण्यात येईल.

२१.**कामावर संनियंत्रण :-**

i. तालुका पातळीवर कामाचे संनियंत्रण गटविकास अधिकारी करतील. कोणत्याही ग्राम सभेद्वारे प्रस्तावित कार्ये वेळच्या वेळी मंजूर होऊन क्रियान्वित होतील याची सर्वस्वी जबाबदारी गट विकास अधिकारी पार पाडतील.

ii. आदिवासी विकास विभागाचे प्रकल्प अधिकारी, गटविकास अधिकारी तसेच तालुकास्तरावरील अन्य विभागातील अधिकाऱ्यांचे प्रत्येक तिमाहीला आढावा घेतील.

iii. जिल्हा कार्यक्रम समन्वयक प्रत्येक ६ महिन्यात बैठका घेऊन येणाऱ्या अडचणी सोडवतील.

iv. वरील बैठकांमध्ये SECURE संगणक प्रणालीतील डेटाचा वापर करण्यात यावा.

v. गरजेनुसार या बैठकांमध्ये अंमलबजावणीत अडचण येत असलेल्या ग्राम सभेतील प्रतिनिधी सुद्धा आमंत्रित करता येईल.

vi. धोरणानुसार कामाचे सामाजिक अंकेक्षण तसेच स्थानिक निधी अंकेक्षण करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२१११३०१६४९३२४३१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by NANDKUMAR VERMA
Date: 2021.11.30 16:52:57 +05'30'

**( नंदकुमार )**
**अपर मुख्य सचिव (रो.ह.यो)**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
३. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद
६. अ.मु.स. (रोहयो) यांचे स्विय सहायक
७. सचिव (आदिवासी विकास विभाग) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई - ३२
८. सर्व विभागीय आयुक्त
९. आयुक्त (नरेगा), महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर
१०.आयुक्त (आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था), महाराष्ट्र राज्य, पुणे
११.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१२.प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर
१३.संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.संचालक, फलोत्पादन, पुणे
१५.संचालक, सामाजिक वनिकरण, पुणे

१६.सर्व जिल्हाधिकारी
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१९.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
२०.महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर,
२१.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २,मुंबई / नागपूर,
२२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२३.सर्व उपसचिव/अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (रोहयो)
निवडनस्ती मग्रारो-१,